२०१०१११६१८१६०५००१

विकास योजना - नवापूर (जि. नंदुरबार)

मौजे नवापूर येथील गट क्र. ७७ मधील २२३०.४८ चौ.मी. क्षेत्र "विद्यमान कृषी उत्पन्न बाजार समिती" मधून वगळून सार्वजनिक निमसार्वजनिक विभागात दर्शविणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम १९६६ चे कलम ३७ (२) अन्वये मंजूरी....

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिपीएस-२५१०/१९३७/प्र.क्र.२४४/१०/नवि-९,**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२, दिनांक: ९ नोव्हेंबर, २०१०**

**शासन निर्णय**:- सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३). जिल्हाधिकारी, नंदुरबार.
४) उप सचिव (नगर रचना) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
६) सहायक संचालक नगररचना, नंदुरबार शाखा, नंदुरबार.
७) मुख्याधिकारी, नवापूर नगर परिषद, जिल्हा नंदुरबार.
८) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार येरवडा कारागृह, पुणे.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात भाग-१ नाशिक विभागीय पुरवणी मध्ये प्रसिध्द करुन त्यांच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास व ५ प्रती संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.)
९) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची अधिसूचना विभागाच्या वेब साईटवर ठेवावी.)
१०) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

**अधिसूचना**
**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : ९ नोव्हेंबर, २०१०.**

*महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६*

**क्र.टिपीएस-१५१०/१९३७/प्र.क्र.२४४/१०/नवि-९:** ज्याअर्थी, नवापूर शहराची (जिल्हा नंदुरबार) विकास योजना (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधिलेली) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी अधिसुचना क्र. डि.पी./नवापूर/टिपीव्ही-४/५०५२, दि. ४ ऑगस्ट, १९८९ अन्वये महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७) (यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधले आहे) चे कलम ३१(१) अन्वये मंजूर केली आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत मौजे नवापूर येथील गट क्र. ७७ मधील २२३०.४८ चौ.मी. क्षेत्र (यापुढे "उक्त क्षेत्र" असे संबोधिले आहे) "विद्यमान कृषी उत्पन्न बाजार समिती" म्हणून दर्शविण्यात आले आहे ;

आणि ज्याअर्थी, नवापूर नगर परिषदेने उक्त क्षेत्र "विद्यमान कृषी उत्पन्न बाजार समिती" वापरातून वगळून शैक्षणिक प्रयोजनार्थ दर्शविणेबाबत, उक्त अधिनियमाचे कलम ३७ (१) अन्वयेची कार्यवाही पुर्ण करुन फेरबदल प्रस्ताव शासनास मंजूरीस्तव सादर केला आहे (यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे संबोधिले आहे) ;

आणि ज्याअर्थी, आवश्यक त्या चौकशीनंतर व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त फेरबदल प्रस्तावास काही बदलांसह व अटींसह मान्यता देणे आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे ;

आता, त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम ३७ चे पोटकलम (२) अन्वये असलेल्या अधिकारांचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदल प्रस्तावास काही बदलांसह व अटींसह मंजूरी देण्यात येत आहे आणि त्यासाठी उक्त विकास योजना मंजूरीची उपरोल्लिखित दि. ४ ऑगस्ट, १९८९ ची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे ;

विकास योजना मंजूरीच्या अधिसूचनेच्या फेरबदल सूचीतील शेवटच्या नोंदीनंतर पुढील नव्या नोंदीचा समावेश करण्यात येत आहे-

**नोंद**

"मौजे नवापूर येथील गट क्र. ७७ मधील २२३०.४८ चौ.मी. क्षेत्र "विद्यमान कृषी उत्पन्न बाजार समिती" मधून वगळून नकाशात दर्शविल्यानुसार खालील अटींवर सार्वजनिक व निमसार्वजनिक विभागात समाविष्ठ करण्यात येत आहे -

**अट -** संस्थेने सादर केलेल्या मोजणी नकाशात पूर्व हद्दीवर शाळेची इमारत बांधलेली दिसून येते. या इमारत बांधकामास सामासिक अंतर सोडलेले नसल्याने सदरची अस्तित्वातील शाळेची इमारत पाडून टाकणे आवश्यक राहील. मोजणी नकाशात दर्शविलेले पडीत क्षेत्र जे शैक्षणिक संस्थेच्या ताब्यात आहे पण ज्याचा समावेश प्रस्तावित फेरबदलात नाही, ते क्षेत्र क्रीडांगण म्हणून वापरावे लागेल.

<u>**टिप:-**</u> क) प्रस्तुत अधिसूचनेची प्रत मुख्याधिकारी, नवापुर नगर परिषद, जिल्हा नंदुरबार यांच्या कार्यालयात कार्यालयीन वेळेमध्ये नागरिकांच्या अवलोकनार्थ एका महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आली आहे.

ख) सदर अधिसूचना विभागाच्या w.w.w.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

( प्रदीप गोहिल )
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated – 9th November, 2010**
**NOTIFICATION**

***The Maharashtra Regional and Town Planning Act 1966***

**No. TPS-1510/1937/CR-244/10/UD-9:** Whereas, the Development Plan of Navapur City (Dist. Nandurbar) (hereinafter referred to as "the said Development Plan") has been sanctioned by the Director of Town Planning, Maharashtra State, Pune under section 31(1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act No. XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") vide his Notification No. DP-Navapur/TPV-IV/5052, dated 4th August, 1989 has come into force with effect from 30th September, 1989 ;

And whereas in the said Development Plan, the land bearing Gat No. 77 of Mouje Navapur admeasuring 2230.48 sq.mt. is shown as "Existing A.P.M.C." (hereinafter referred to as "the said Land") ;

And whereas the Navapur Municipal Council has submitted the modification proposal to Government to delete the said land from 'Existing A.P.M.C.' and to include the land so released in Educational purpose after following all the legal formalities stipulated under section 37 (1) of the said Act (hereinafter referred to as "the said Modification Proposal") ;

And whereas, after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune and after making necessary enquiries the Government is of the opinion that in the said Modification Proposal should be sanctioned with some changes and conditions ;

Now, therefore, in exercise of the powers conferred under sub section (2) of the section 37 of the said Act, Government hereby sanctions the said Modification Proposal with some changes and conditions and for that purpose amends the above referred Notification dated 4th August, 1989 as follow :-

In the Schedule of Modification appended in the Notification sanctioning the said Regulations, following new entry shall be added after last entry –

## ENTRY

'The land bearing Gat No. 77 of Mouje Navapur admeasuring 2230.48 sq.mt. is deleted from 'Existing A.P.M.C.' and land so released is included in Public Semi public Zone as shown on plan subject to following conditions –

**Condition –** In the Measurement Sheet submitted by the Institute, school building is shown constructed on the eastern boundary. As there are no marginal distances kept for the building, this Existing School building required to be demolished. The vacant area shown on the Measurement Sheet which is in possession of the Institute but which is not included in the modification should be used for play ground.'

**Note:–** A) A copy of the Notification is kept open for inspection by the general public in the office the Chief Officer, Navapur Municipal Council, Dist. Nandurbar for the period of one month.

B) This Notification is also available on Govt. web site **www.urban.maharashtra.gov.in**

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

(Pradeep Gohil)

**Section Officer to Government.**